श्री.तुषार मेहता, विशेष अधिवक्ता,
नवी दिल्ली यांना व्यावसायिक फी
प्रदान करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: याचिका-२०२१/८६०/प्र.क्र.१९९/म-१(धोरण)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक : ०१ जुलै, २०२४

**संदर्भ:** (१) मुख्य नियंत्रक, महसूल प्राधिकारी, महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र. D.O.१४/Reliance/SLP(C No.३४८३२/२०१६/५८/२०२३, दि.०९/१/२०२३
(२) विधि व न्याय विभाग,जा. क्र.६१-२०२३/E Branch, दि.०२/०२/२०२३ चे पत्र
(३) वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि.२९.७.२०१५
(४) वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि.१६.६.२०१७
(५) मा.मुख्य सचिव कार्यालयाची टिप्पणी दि.१२/१२/२०२२, दि.४/१/२०२३ व दि.२१/३/२०२४

**प्रस्तावना**:

मे. रिलायन्स इंडस्ट्रिज लि. विरुध्द मुख्य नियंत्रक महसूल प्राधिकारी,महाराष्ट्र राज्य,पुणे व इतर या प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालय,नवी दिल्ली येथे दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र.३४८३२/२०१६ च्या अनुषंगाने नोंदणी व मुद्रांक विभाग पर्यायाने शासनाची बाजू मांडण्याकरिता संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये विधि व न्याय विभागाच्या मान्यतेने ॲड. तुषार मेहता, विशेष अधिवक्ता यांची शासनाच्या वतीने विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आलेली होती. सदर न्यायालयीन प्रकरणी ॲड. तुषार मेहता, विशेष अधिवक्ता यांची व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:

मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. ३४८३२/२०१६ मध्ये मे.रिलायन्स इंडस्ट्रीज लि. विरुध्द मुख्य नियंत्रक, महसूल प्राधिकारी, महाराष्ट्र राज्य, या न्यायालयीन प्रकरणात ॲड. तुषार मेहता, विशेष अधिवक्ता यांनी शासनाची बाजू प्रभावीपणे मांडल्याप्रकरणी या शासन निर्णयान्वये ॲड. तुषार मेहता, विशेष अधिवक्ता यांना व्यावसायिक दराने रु. ८,८०,०००/-(अक्षरी आठ लाख ऐंशी हजार फक्त) इतकी फी खालील विवरणपत्रात दर्शविलेल्या बाबींकरिता अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | Case No | Case Details | Appearance Date | Amount |
|---|---|---|---|---|
| १. | SLP ( C ) No.३४८३२/२०१६ | Reliance Industires Limited Vs The Chief Controlling Revenue Authority | ३.१२.२०२१ | ४,४०,०००/- |
| २. | SLP ( C ) No.३४८३२/२०१६ | Reliance Industires Limited Vs The Chief Controlling Revenue Authority | ४.२.२०२२ | ४,४०,०००/- |
| | एकूण रुपये | | | ८,८०,०००/- |

२.  सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. तुषार मेहता यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरिता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

३.  वरील बाबींकरिता होणारा खर्च विभागाच्या मागणी क्र. सी-२, मुख्य लेखाशिर्ष- २०३०,नोंदणी ०३, संचालन व प्रशासन-००१,(००)(००)(०१) नोंदणी महानिरीक्षक व जिल्हा निबंधक(अनिवार्य),(२०३००१०९) कार्यालयीन खर्च-१३ या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२०२५ मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्चाच्या अदायगीकरति नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक महाराष्ट्र राज्य,पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४.  हा शासन निर्णय विधि व  न्याय विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. ७०७-२०२२/ई, दि.१.११.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि.१६ जून २०१७ चे परिशिष्ठ-अ, वित्तीय अधिकार नियम पुस्तीका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम -१९६५ मधील वित्तीय अधिकाराच्या मर्यादेमध्ये सुधारणा,भाग-पहिला,उपविभाग-दोन,अनु.क्र.४९ मधील नियम १६६-अ,अन्वये प्रशासकीय विभागप्रमुख यांना प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in  या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२४०७०३१२०७१२१३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल  यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL MALHARI JADHAV

Digitally signed by SUNIL MALHARI JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=a21caf384aa15b3f0e12f6f625410d8384fc1918599ab1b89ed39b6b8df74cd2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD3ACD0AE1800C2E54A0083162CA707A773B2FEF3AE4C523B53B902E3CF10460, cn=SUNIL MALHARI JADHAV
Date: 2024.07.03 12:21:43 +05'30'

**( सुनिल जाधव )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन,मुंबई-३२
२. मा.मुख्यमंत्री  यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
३.  मा.उपमुख्यमंत्री  यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
३. मा.मंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२
४. अप्पर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय,मुंबई-३२
५. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य, पुणे
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य,नागपूर १/२
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/नागपूर
९.  ॲड. तुषार मेहता, वरिष्ठ अधिवक्ता यांना (नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य, पुणे) यांचे मार्फत
१०. कार्यासन अधिकारी (ई-शाखा), विधि व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
११.  कार्यासन अधिकारी, वित्त विभाग/ व्यय-७,मंत्रालय,मुंबई-३२
१२.  निवडनस्ती-म-१(धोरण).